ग्रंथपाल गट ब यांच्या नावे
स्वीय प्रपंजी लेखा सुरु करणेबाबत
शासकीय जिल्हा ग्रंथालय १) सिंधुदुर्ग, २) नंदूरबार,
३)सोलापूर, ४) सांगली, ५) अहमदनगर

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक : मराग्र २००९/(४०२/०९)भाग-१, साशि-५,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४ जानेवारी २०१०

वाचा : १) शासन निर्णय,उ.व.तं.शि.वि.क्र.मराग्रं १०९६/१५८३६/(२४१)साशि-५, दि.२४/०७/१९९८
२)शासन निर्णय,उ.व त.शि विभाग क्र.मराग्रं १००३/(१६५/०३)साशि-५, दि.०६/०२/२००४
३) शासन निर्णय ,उ.व त.शि विभाग क्र.मराग्रं १००४/(५४/०४)साशि-५, दि. ०४/१२/२००४
४) शासन निर्णय, ,उ.व त.शि विभाग क्र. मराग्रं २००८/(६४१/०८)साशि-५, दि. २७/०४/२००९
५) ग्रंथालय संचालक, महा. राज्य. मुंबई यांचे क्र. ५५/शाजिग्रं/पीएलओ/२००९-१०/३६०३,
दिनांक २६/०६/२००९ चे पत्र

**प्रस्तावना :** संदर्भाधिन क्र. २ व ३ येथील दि.०६/०२/२००४ व ०४/१२/२००४ च्या शासन निर्णयान्वये १५ शासकीय जिल्हा ग्रंथालये स्थापन करण्यास शासन मंजूरी देण्यात आली. तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील दि२७/०४/२००९ च्या शासन निर्णयान्वये १० ग्रंथालयाकरिता प्रत्येकी ४ पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्यात आली. संदर्भ क्रमांक १ वरील शासन निर्णयान्वये विभागीय ग्रंथालये व जिल्हा ग्रंथालयांच्या वैयक्तिक व संस्था सभासदांना खालील प्रमाणे फी आकारण्यात आली आहे :-

| | प्रवेश फी | अनामत रक्कम |
|---|---|---|
| १) वैयक्तिक सभासद | रु. २०/- | रु.१००/- |
| २) संस्था सभासद | रु. १५०/- | रु.५००/- |

वैयक्तिक सभासद / संस्था सभासद यांचेकडून वरीलप्रमाणे प्राप्त होणारी रक्कम ठेवण्यासाठी ग्रंथालयाच्या नावाने कोषागारात खाते उघडणे आवश्यक आहे. त्याकरिता १) सिंधुदुर्ग २) नंदूरबार, ३) सोलापूर, ४) सांगली, ५) अहमदनगर कार्यक्षेत्रातील "शासकीय जिल्हा ग्रंथालयांचे ग्रंथपाल - गट ब" यांच्या नावे संबंधित शासकीय कोषागारात स्वीय प्रपंजी लेखा (PLA) उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** वरील बाब लक्षात घेऊन, ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील १) सिंधुदूर्ग, २) नंदूरबार, ३) सोलापूर, ४) सांगली, ५) अहमदनगर या "शासकीय जिल्हा ग्रंथालयाचे ग्रंथपाल, "गट ब" " यांच्या नावे संबंधित शासकीय कोषागारात लेखा परीक्षेच्या अधीन राहून स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यास खालील शर्ती व अटींच्या अधिन राहून शासनाची परवानगी देण्यात येत आहे.

१) स्वीय प्रपंजी लेख्याच्या (PLA) प्रशासकाचे पदनाम व कोणत्या कोषागारात / उपकोषागारात स्वीय प्रपंजी लेखा उघडावयाचा आहे त्या कोषागाराचे नाव,

२) स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये (PLA) कोणत्या रकमा जमा कराव्यात या बाबतचा तपशील सुनिश्चित असून तो सुस्पष्टपणे नमुद करावा, ( उदा :-सभासदांकडून घेण्यात येणारे डिपॉझिट व किंमती पुस्तकांसाठी घ्यावयाचे डिपॉझिट, महसूली जमा या खात्यात जमा होणार नाही.)

३) स्वीय प्रपंजी लेख्यामधून (PLA) कोणत्या कारणासाठी रकमा काढता येतील याबाबतचा तपशील बाब निहाय सुस्पष्टपणे नमुद करावा, (उद:- फक्त जादा किंमतीच्या पुस्तकांसाठी घेतलेली रक्कम (डिपॉझिट) आणि सभासदत्व समाप्त करताना त्यास द्यावयाच्या डिपॉझीटची रक्कम ) सदरहू लेखाखात्यातून कोणत्याही प्रकारचा महसूली खर्च केला जाणार नाही.

४) स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये (PLA) तीन वर्षे व्यवहार न झाल्यास महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम ४९५ च्या तरतूदीप्रमाणे विहित कार्यपध्दती अनुसरुन कोषागार अधिका-याने उक्त खाते बंद करण्याची कार्यवाही करावी,

५) सदर लेख्याचे पासबूक दरमहा कोषागाराकडे पाठवावे. आर्थिक वर्ष संपताच वर्षाअखेर स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये (PLA) शिल्लक असलेल्या रकमेचे " शिल्लक प्रमाणपत्र " संबंधित अधिका-याने / प्रशासकाने कोषागार अधिका-यांना पाठवावे. सदरचे पासबुक सलग तीन महिने कोषागाराकडे न पाठविल्यास किंवा आर्थिक वर्ष संपताच पुढील ३१ मे च्या आत शिल्लक रकमेचे प्रमाणपत्र न पाठविल्यास, सदर कार्यवाही पूर्ण होईपर्यंत कोषागाराकडून पुढील प्रदाने केली जाणार नाहीत.

६) स्वीय प्रपंजी लेख्यामधील (PLA) शिलकीचा कोषागार लेख्याबरोबर ताळमेळ घेण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकावर राहील.

७) कोषागारासाठी लेखांकन नियम १९९२ (Accounting Rules For Treasuries १९९२) व महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील पी.एल.ए. विषयक सर्व तरतूदी लागू राहतील.

८) पी.एल.ए. चे व्यवहार प्रत्यक्ष सुरु करण्यासाठी महालेखापाल यांचे प्राधिकारपत्र आवश्यक राहील.

९) तपशीलवार लेखे योग्य रितीने ठेवणे, महालेखापाल यांना विहित नियतकालिक लेखे व नियतकालिक विवरणे सादर करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकाची राहील.

३. वैयक्तिक सभासद आणि संस्था सभासद यांचेकडून प्राप्त होणारी फी / रक्कम म.को.नियम १९६८ मधील नियम क्र. ८ (१) नुसार खालील लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी :-

| अ) प्रवेश अनुज्ञाप्ती आणि मासिक वर्गणी (Entrance Fees & Monthly Subscription ) | ब) अनामत रक्कम (Deposit) |
|---|---|
| M.H. 0202-Education, Sports, Arts & Culture, | 8443 – Education, Sports, Arts & Culture |
| 04- Art & Culture | 00 – |
| 105 - Public Libraries | 106 – PD / PLa |
| 01 – Government Libraries - | 01 – Library Deposits |
| 01 – Genral Library ----- (Name) | |
| 00 – Government Libraries -----( Name of place) | 01 – Government Libraries -------- (Name of place) |
| 01 – Fees | 01 – Fees |

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१९०/०९/कोषा ५,दि.०३/११/२००९, तसेच महालेखापाल-१ (अधिदान व लेखा) मुंबई यांच्या अनौ. संदर्भ क्र. TM/Ch.2/PLA/HTED/09-10./1291 दिनांक १४/१२/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णयWWW.maharashtra.gov.in 201001141705150001या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( बा. ओं. हेमाडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
ग्रंथपाल वर्ग २, शासकीय जिल्हा ग्रंथालय, सिंधुदुर्ग / नंदूरबार / सोलापूर / सांगली / अहमदनगर (संचालकांमार्फत)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी सिंधुदुर्ग / नंदूरबार / सोलापूर / सांगली / अहमदनगर
महालेखापाल , महाराष्ट्र १ मुंबई / वित्त विभाग कोषा ५
कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग / निवडनस्ती साशि-५